**<u>रेशीम उद्योग विकास</u>**

केंद्र पुरस्कृत (CDP) योजनेंतर्गत केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याचा निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

शासन निर्णय क्रमांकः केंपुयो-१११४/ प्र. क्र.४०/ रेशीम कक्ष

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १६ ऑक्टोबर, २०१४

**<u>वाचा :</u>**

१) शासन निर्णय, स. प. व व. वि. क्रमांकः रेशीम-१००७/ प्र. क्र. १९०/ रेशीम कक्ष, दिनांक १३ सप्टेंबर, २०१०

२) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः रेशीम-१००७/ प्र. क्र. १९०/ रेशीम कक्ष, दिनांक १ फेब्रुवारी, २०११.

३) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः रेशीम-१११२/ प्र. क्र. १७०/ रेशीम कक्ष, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१३.

४) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः केंपुयो-१११३/ प्र. क्र. १०४/ रेशीम कक्ष, दिनांक २ जानेवारी, २०१४

५) रेशीम संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र. रे/ कार्या-९/ केंपुयो/ रा.हि.सम/१४/८१०, दिनांक २८ मार्च, २०१४.

६) रेशीम संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र. रे/ कार्या-९/ केंपुयो/ रा.हि.सम/१४/८२३, दिनांक २९ मार्च, २०१४.

७) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः केंपुयो-१३१४/ प्र. क्र. ७/ रेशीम कक्ष, दिनांक ५ मे, २०१४.

८) केंद्रीय रेशीम मंडळ, बंगलोर यांचे पत्र क्र. सीएसबी-१२८/सीडीपी-Nodal Officer/Maha/ २०१४-१५ दि. २५ जून, २०१४.

९) केंद्रीय रेशीम मंडळ, प्रादेशिक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. सीएसबी/RO/MUM/१०४(PMC)/२०१४-१५/ TECH दि. २६ जून, २०१४

१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंदाज-२०१४/ प्र. क्र.११०/२०१३/ अर्थ-३, दिनांक १ जुलै, २०१४.

११) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः केंपुयो-१११४/ प्र. क्र.४०/ रेशीम कक्ष, दिनांक १ सप्टेंबर, २०१४

१२) संचालक (रेशीम), नागपूर यांचे पत्र क्र. रे/ कार्या-९/ केंपुयो/ Cash Flow/१४-१५/८६७, दिनांक ३ एप्रिल, २०१४ व दि. २७ मे, २०१४.

**प्रस्तावना :**

राज्यात केंद्रीय रेशीम मंडळाच्या आर्थिक सहाय्याने तुती व टसर रेशीम वाढी करीता वर नमूद दिनांक १३ सप्टेंबर, २०१० व दिनांक १ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये रेशीम उद्योग विकासाच्या केंद्र-राज्य हिश्श्याच्या विविध योजना राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये केंद्र पुरस्कृत योजनेच्या मानकांमध्ये काही बदल झाल्याने सुधारीत मानकांना वर नमूद दिनांक २२ फेब्रुवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि केंद्रीय रेशीम मंडळाने या योजनेमध्ये नविन बाबींचा अंतर्भाव करून सध्याच्या मानकांमध्ये बदल केला असल्याने सुधारीत मानकांना वर नमूद दिनांक ५ मे, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजुरी देण्यात आली आहे. केंद्रिय रेशीम मंडळाकडून सन २०१२-१३ मध्ये प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याची रक्कम रु. ५५८.६३ लाख व त्या प्रमाणातील राज्य हिस्सा रु. ३७९.०९ लाख सन २०१३-१४ या वर्षात वर नमूद दिनांक २ जानेवारी, २०१४ च्या शासन निर्णयान्वये खर्च करण्यासाठी रेशीम संचालनालयास उपलब्ध करून देण्यात आला होता. या निधीपैकी केंद्र हिश्श्याचा रु. १७९.५४ लाख निधी मार्च, २०१४ अखेर अखर्चित राहिला होता. तसेच सन २०१३-१४ मध्ये केंद्र हिश्श्याचा रु. ९५१.७२५ लाख निधी उपलब्ध झाला होता. तथापि सदर निधी दिनांक ३१ मार्च, २०१४ अखेर वितरीत होवू शकला नव्हता. हा सर्व अखर्चित निधी सन २०१४-१५ मध्ये खर्च करण्यास केंद्रीय रेशीम मंडळाने वर नमूद दिनांक २५ व २६ जून, २०१४ च्या पत्राने मान्यता दिली आहे.

वरीलपैकी सन २०१३-१४ मध्ये प्राप्त झालेला तथापि ३१ मार्च २०१४ अखेर वितरीत न होवू शकलेला रु. ९५१.७२५ लाख केंद्र हिश्श्याचा निधी व त्या प्रमाणातील राज्य हिश्श्याचा रु. ८२८.७० लाख निधी वर नमूद दिनांक १ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तथापि रु. १७९.५४ लाख केंद्र हिस्सा व त्या प्रमाणातील राज्य हिस्सा त्यावेळी वितरीत होवू शकला

नव्हता. त्यामुळे सदर निधी व त्या प्रमाणातील राज्य हिश्श्याची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

वर नमूद केल्याप्रमाणे रेशीम उद्योग विकासाच्या केंद्र पुरस्कृत Catalytic Development program (CDP) या योजनेचा सन २०१३-१४ मध्ये वितरीत करण्यात आलेला तथापि दि. ३१ मार्च, २०१४ अखेर अखर्चित राहिलेला रु. १७९.५४ लाख निधी व त्या प्रमाणातील राज्य हिश्श्याचा रु. ८६.४६ लाख निधी वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

सदर तरतूद खर्च करण्यासाठी संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून त्यांनी ती संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांना वितरीत करावी. सदर तरतूद BDS प्रणालीवर वितरीत करण्यात आली आहे.

सदर निधी १२ व्या पंचवार्षिक योजनेच्या सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजुरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सूचनांनुसार खर्च करावी. तसेच ज्या योजनांसाठी व बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्रीय रेशीम मंडळ व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

सदरचा खर्च केंद्र हिश्श्यासाठी " मागणी क्र. व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१- ग्रामोद्योग व लघुद्योग-११० संमीश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२) (४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (२८५१ १२६९), ३१, सहायक अनुदाने" या खाली सन २०१३-१४ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या रु. ३०३४.२७ लाख तरतूदीतून तसेच राज्य हिश्श्यासाठी " मागणी क्र. व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१- ग्रामोद्योग व लघुद्योग-११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२) (४५) रेशीम उत्पादन उद्योगाचा विकास, खादी ग्रामोद्योग (२८५१ १२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) " या खाली सन २०१३-१४ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या रु. १४०३.५० लाख निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने, नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १३१/१४३१ दिनांक २३ जून, २०१४ तसेच वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ४४८/१४/व्यय-२ दिनांक १२ सप्टेंबर, २०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१६१५५६५९९१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2014.10.16 16:11:20 +05'30'

( वि. रा. ठाकूर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१-२, (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२. वरिष्ठ उपमहालेखापाल (पडताळणी), बाह्य लेखा परीक्षा विभाग (नागरी), मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्ष अधिकारी, मुंबई
५. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगरे वगळून)
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. नियोजन विभाग (का- १४३१) मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय-२/ अर्थसंकल्प-१३) मंत्रालय, मुंबई
९. संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.सर्व सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालये
११.सर्व जिल्हा रेशीम अधिकारी
१२.कार्यासम अधिकारी (का-१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवड नस्ती (रेशीम कक्ष)